जैविक कीटकनाशके व जैविक खते यांच्या शासकीय योजनेत खरेदी करावयाच्या कार्यपध्दतीबाबत.

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सीपीएस १११४ /प्र.क्र. ११३ /१७अे**

**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मंत्रालय, विस्तार, मुंबई ४०० ०३२**

**तारीख: ६ सप्टेंबर, २०१४**

वाचा :-१) या विभागाचे पत्र क्र. सीपीएस२०१०/प्र.क्र.५८/१७अे दि.८ ऑगस्ट,२०११

२) या विभागाचे पत्र क्र. सीपीएस२०१२/प्र.क्र.२५६ /१७ अे दि.१०जुन,२०१३

३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.सीपीएस/जै.किना/२०१२-१३/९१/गुनि-५/२०१४ दि.१८जुन,२०१४

**प्रस्तावना :-**

विविध केंद्र/राज्य पुरस्कृत योजनातंर्गत जैविक कीटकनाशके,फेरोमन ट्रॅप्स,ल्युअर्स,जैविक खते व सुक्ष्म मुलद्रव्ये इत्यादी जैविक निविष्ठांचा पुरवठा करण्याकरिता संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये जिल्हास्तरावर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली एक वर्षासाठी प्रायोगिक तत्वावर समिती गठीत करण्यास मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर सदर समितीत जिल्हयाच्या जवळील जिल्हयातील शासकीय जैविक किटकनाशक प्रयोगशाळांचे तंत्र अधिकारी यांचा समावेश करुन समितीस संदर्भ क्रमांक २ येथील पत्रान्वये मे,२०१४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आयुक्त (कृषि) यांनी संदर्भ क्रमांक ३ येथील पत्रान्वये कळविल्याप्रमाणे सदर समितीस जून,२०१४ पासून शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

विविध केंद्र/राज्य पुरस्कृत योजनातंर्गत जैविक कीटकनाशके,फेरोमन ट्रॅप्स,ल्युअर्स,जैविक खते व सुक्ष्म मुलद्रव्ये इत्यादी जैविक निविष्ठांचा पुरवठा करण्याकरिता संदर्भ क्रमांक २ येथील पत्रान्वये जिल्हास्तरावर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या खालील समितीस जून,२०१४ पासून शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी | -- | अध्यक्ष |
| २. कृषि उपसंचालक, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, कार्यालय | -- | सदस्य |
| ३. जिल्हयाशी संलग्न कृषि विद्यापीठातील एक तज्ञ | -- | सदस्य |
| ४. जिल्हा गुणवत्ता नियंत्रण निरीक्षक | -- | सदस्य |
| ५. जिल्हयाच्या जवळील जिल्हयातील शासकीय जैविक कीटकनाशक प्रयोगशाळांचे तंत्र अधिकारी | -- | सदस्य |
| ६. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांचे कार्यालयातील तंत्र अधिकारी | -- | सदस्य सचिव |

२. जैविक कीटकनाशके, फेरोमन ट्रॅप्स, व ल्युअर्स, जैविक खते व सुक्ष्म मुलद्रव्ये इत्यादी जैविक निविष्ठांची मागणी शासकीय किटकनाशक प्रयोगशाळा/ कृषि विद्यापीठे, कृषि विज्ञान केंद्रे व शासनमान्य पुरवठा संस्थेकडे करावी याकरिता खालील कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

१. सदर समितीने जैविक कीटकनाशके, फेरोमन ट्रॅप्स, व ल्युअर्स, जैविक खते व सुक्ष्म मुलद्रव्ये यांची जिल्हयातील मागणी विचारात घेऊन वरील समितीकडे मंजूरीसाठी सादर करावी.समितीने मंजूरी दिल्यानुसार निविष्ठांची मागणी थेट शासकीय कीटकनाशक प्रयोगशाळा/ कृषि विद्यापीठे/ कृषि विज्ञान केंद्रे/ शासनमान्य पुरवठा संस्थाकडे नोंदवावी.

२. स्थानिक परिस्थितीनुसार कीड/रोग व निविष्ठांच्या उपलब्धतेच्या अनुषंगाने पूर्वी ठरविलेल्या निविष्ठां संचामध्ये (कीट) काही बदल करावयाचे झाल्यास कृषि विद्यापीठांतील संबंधित शास्त्रज्ञांच्या सल्ल्याने जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना करता येईल.

३. जैविक कीटकनाशकांच्या मात्रा व शिफारशी केंद्रीय कीटकनाशक नोंदणी मंडळाने दिलेल्या आहेत. या व्यतिरिक्त कृषि विद्यापीठातील शास्त्रज्ञांच्या शिफारशी असल्यास शास्त्रज्ञांचा सल्ला लेखी स्वरुपात घेणे बंधनकारक राहील. व त्यानुसार जैविक कीटकनाशकांचा वापर करता येईल.

४. जैविक कीटकनाशके, फेरोमन ट्रॅप्स, व ल्युअर्स, जैविक खते व सुक्ष्म मुलद्रव्ये या संदर्भात या व्यतिरिक्त कृषि आयुक्तालयाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सुचनांच्या/परिपत्रकांच्या अधिन राहून कार्यवाही करावी.

५. विविध केंद्र/राज्य पुरस्कृत योजनातंर्गत अखर्चीत निधी राहील्यास बाब बदल करण्याचे अधिकार जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना राहतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०६१५११९५३२१०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasave Akusing N

Digitally signed by Vasave Akusing N
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agri & ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasave Akusing N
Date: 2014.09.06 15:15:09 +05'30'

( आ.न.वसावे )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव
३) अपर मुख्य सचिव (कृषि ) यांचे स्वीय सहाय्यक
४) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता ) मुंबई / नागपूर
६) सर्व संचालक / सहसंचालक कृषि आयुक्तालय, पुणे
७) संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, पुणे
८) सर्व विभागीय कृषि सहसंचालक
९) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
१०) कुलसचिव, सर्व कृषि विद्यापीठे
११) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२) निवडनस्ती